**महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिम**

दिनांक १४ ऑगस्ट, २०१० रोजी मोहिमेची जाहिरात वृत्तपत्रामधून प्रसिध्द करण्याच्या खर्चास मंजुरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक-तंमुगा १०१०/प्र.क्र.७६/२०१०/पोल-१५

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक - २८ सप्टेंबर, २०११.

**वाचा :** -

१) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-तंमुगा १००८/प्र.क्र.४३/२००८/पोल-१५, दिनांक १४ ऑगस्ट, २००८.

२) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक- तंमुगा १०१०/प्र.क्र.७६/२०१०/पोल-१५, दिनांक ३० नोव्हेंबर, २०१०.

३) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक- तंमुगा १०१०/प्र.क्र.७६/२०१०/पोल-१५, दिनांक १० जानेवारी, २०११.

४) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक १०१०/प्र.क्र.७६/२०१०/पोल-१५, दि.२९ मार्च,२०११

**शासन निर्णय** - शासन निर्णय, गृह विभाग, दिनांक १४ ऑगस्ट, २००८ मधील तरतुदीनुसार महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिमेची जाहिरात दूरदर्शन, आकाशवाणी तसेच राज्यातील "ब" व "क" वर्गवारीतील वृत्तपत्रामधून प्रसारित करण्यात येत आहे. त्यानुसार सन २०१०-११ या वर्षाच्या मोहिम अंमलबजावणीत राज्यातील ग्रामपंचायतींनी दिनांक १५ ऑगस्ट, २०१० ते ३० ऑगस्ट, २०१० या कालावधीत आपला सहभाग निश्चित करावयाचा होता. त्यासंबंधीची माहिती ग्रामपंचायतींना व्हावी या दृष्टीकोनातून दिनांक १४ ऑगस्ट, २०१० रोजी राज्यातील सर्व ब व क वर्गातील वृत्तपत्रामधून मोहिमेची ४०० चौ.सें.मी आकाराची कृष्णधवल जाहिरात महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ३२ यांच्यामार्फत प्रसारीत करण्यात आली आहे. त्यानुसार संदर्भीत (२) येथील आदेशान्वये एकूण ३७७ वृत्तपत्रातील जाहिरातीच्या खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, संदर्भीत (३) येथील आदेशान्वये २३ वृत्तपत्रातील जाहीरातीच्या खर्चास मंजूरी देण्यात आली आहे.तसेच संदर्भीत (४) येथील आदेशान्वये २७ वृत्तपत्राची देयके मंजुर करण्यात आली आहेत.

२. राज्यातील "ब" व "क" वर्गवारीतील आणखी ७ वृत्तपत्रांची देयके मंजुरीसाठी विभागास प्राप्त झालेली आहेत सदर देयके माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने विहित केलेल्या जाहिरातीच्या दरानुसार प्रमाणित केलेली आहेत. प्रमाणित केलेल्या ७ वृत्तपत्राच्या देयकांचे विवरणपत्र सोबत जोडण्यात आले आहे. या देयकांच्या अदायगीसाठी एकूण रुपये २८,०००/- (अक्षरी रुपये अठ्ठावीस हजार फक्त) इतका खर्च येत असून त्यास या आदेशाद्वारे शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

३. प्रमाणित करण्यात येते की, सदरहू खर्च यापुर्वी अदा करण्यात आलेला नाही.

४. प्रमाणित करण्यात येते की, सदरचा खर्च महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिमेची जाहिरात, प्रसिध्दी व प्रचार यावर करण्यात आला असून विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात आला आहे.

५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे ७ वृत्तपत्राच्या देयकाच्या रुपये २८,०००/- (अक्षरी रुपये अठ्ठावीस हजार फक्त) इतक्या रकमेइतक्या तरतूदीचे जिल्हानिहाय वितरण करतील व संबंधित जिल्हा पोलीस अधीक्षक हे जिल्हयातील वृत्तपत्राच्या देयकांच्या रकमेचे धनादेश तयार करुन त्याचे वितरण करतील.

६. याखाली होणारा खर्च रुपये २८,०००/- (अक्षरी रुपये अठ्ठावीस हजार फक्त) गृह विभाग, मागणी क्रमांक-बी-१ "प्रधान लेखाशिर्ष २०५५ पोलीस (००) (१०) तंटामुक्त गांव मोहिम (२०५५०५३३) २६-जाहिरात व प्रसिध्दी " याखालील सन २०११-१२ या वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२०११०९२८१६१५१२००१**असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(वि. पो . थोरात)**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
जिल्हा पोलीस अधीक्षक, बीड,परभणी,लातुर,सोलापूर (ग्रा), औरंगाबाद (ग्रा),नांदेड, व जळगाव.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग (कार्यासन व्यय-७/अर्थ-२ व अर्थ-११), मंत्रालय, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, बीड,परभणी,लातुर,सोलापूर, औरंगाबाद,नांदेड, व जळगाव.
निवडनस्ती, पोल-१५

********